इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर संस्थेशी संलग्नित असलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर रुग्णालय व अनुसंधान केंद्र, नागपूर येथे नवीन पदव्युत्तर व अतिविशेषोपचार अभ्यासक्रम व ६१५ खाटांचे रुग्णालय सुरू करण्यास मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन निर्णय, क्रमांक : न्यायाप्र - २०१८/ प्र.क्र.१७४/ प्रशा-१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,

९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,

दिनांक : १३ ऑक्टोबर, २०२१

वाचा :
१. शासन निर्णय , वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक एमईडी १०१२ /प्र.क्र. २५१ / शिक्षण -२, दिनांक ०४.०३.२०१४ .
२. शासन पत्र , वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक बैठक-२०२० / प्र.क्र. २४२/प्रशा -१, दिनांक २५.११.२०२० .
३. संचालनालयाचे पत्र क्रमांक संवैशिवस /डॉ.बाआंरुवअकेंना / श्रेणीवर्धन / प्रस्ताव / ४६१४ /अ-५ /२०२१, दिनांक १६.०२.२०२१ .
४. शासन पत्र क्रमांक वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक बैठक - २०२० / प्र.क्र.८४ / प्रशा -१, दिनांक २६.०३.२०२१ .
५. संचालनालयाचे पत्र क्रमांक संवैशिवसं / डॉ बाआंरुवअकेंना / श्रेणीवर्धन / सुधारित प्रस्ताव / ६९४१ / अ-५ /२०२१, दिनांक ०७.०४.२०२१ .
६. संचालनालयाचे पत्र क्रमांक संवैशिवसं / डॉबाआंरुवअकेंना / श्रेणीवर्धन / सुधारित प्रस्ताव / ११८० / अ-५ /२०२१ , दिनांक ०७.०५.२०२१ .

प्रस्तावना :

मा. मंत्रिमंडळाने मार्च, २०१४ मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर रुग्णालय व अनुसंधान केंद्र, नागपूर या संस्थेचे श्रेणीवर्धन करून ५६८ खाटांच्या क्षमतेचे रुग्णालय व नवीन पदव्युत्तर अभ्यासक्रम व अतिविशेषोपचार अभ्यासक्रम सुरू करणे तसेच सदर संस्थेकरिता आवश्यक पदनिर्मितीस तत्त्वत: मान्यता देण्यात आली होती. सदर श्रेणीवधर्ननासाठी उद्भवणारा अनावर्ती खर्च रुपये २०९ कोटी तसेच प्रसंगवशात: होणाऱ्या वाढीव खर्चाच्या आवश्यक निधीची तरतूद अनुसूचीत जाती उपाययोजनेतून करण्यात येईल. त्याचप्रमाणे पहिल्या ५ वर्षाकरिता येणाऱ्या आवर्ती खर्चाकरिता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत अनुसूचीत जाती

उपाययोजनेतून नियतव्यय मंजूर करण्यास मान्यता देणेबाबतचा निर्णय घेतला होता. सदर निर्णयाच्या अनुषंगाने उपरोक्त शासन निर्णय, दिनांक ०४.०३.२०१४ निर्गमित करण्यात आला होता. तथापि, सदर शासन निर्णयानुसार मान्यता प्रदान करण्यात आलेल्या सोयीसुविधा निर्माण करण्यासाठी संबंधित संस्थेकडे जागा उपलब्ध नसल्याने, सदर निर्णयाची अंमलबजावणी होवू शकली नव्हती. दरम्यानच्या कालावधीत सदर संस्थेस उपलब्ध झालेल्या जागेच्या अनुषंगाने डॉ.बाबासाहेब आंबेडकर रुग्णालय व अनुसंधान केंद्र, नागपूर संस्थेच्या श्रेणीवर्धनाबाबतचा सुधारीत कामाची व्याप्ती व अंदाजपकासह, प्राप्त झालेल्या प्रस्तावास मा.मंत्री मंडळाने दिनांक ०६/१०/२०२१ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

विभागाच्या नियंत्रणाखालील इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय संस्थेशी संलग्नित असलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर रुग्णालय व अनुसंधान केंद्र, नागपूर या संस्थेचे श्रेणीवर्धन करून तेथे नवीन पदव्युत्तर, अतिविशेषोपचार अभ्यासक्रम व रुग्णसेवा सुरू करण्यास खालील प्रमाणे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या नियंत्रणाखालील इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय संस्थेशी संलग्नित असलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर रुग्णालय व अनुसंधान केंद्र नागपूर या संस्थेचे श्रेणीवर्धन करून तेथे १७ पदव्युत्तर, ११ अतिविशेषोपचार अभ्यासक्रम, रुग्णालयीन प्रशासन/ व्यवस्थापन विभाग व दंत बाह्यरुग्ण विभाग तसेच अभ्यासक्रमांशी संबंधित ६१५ खाटांचे रुग्णालय सुरू करण्यास तसेच सदर संस्थेचे नामाभिधान “डॉ.बाबासाहेब आंबेडकर अतिविशेषोपचार, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संस्था ” (Dr. Babasaheb Ambedkar Super Speciality Institute of Medical Education and Research (BASIMER) ) असे करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे सदर प्रकल्पाचा अनावर्ती खर्च सुमारे रुपये ९८९.०३ कोटी व प्रथम तीन वर्षाचा आवर्ती खर्च रुपये १७६.६२ कोटी अशा एकूण रुपये ११६५.६५ कोटी खर्चास तसेच तदनंतर सदर संस्थेसाठी प्रतिवर्षी येणाऱ्या रुपये ७८.८० कोटी आवर्ती खर्चास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर संस्थेच्या श्रेणीवर्धनासाठी येणारा अनावर्ती व आवर्ती स्वरुपाचा एकूण रुपये ११६५.६५ कोटी इतक्या खर्चाचे दायित्व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व वैद्यकीय शिक्षण

व औषधी द्रव्ये विभाग यांनी अनुक्रमे ७५ : २५ या प्रमाणात स्वीकारण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. डॉ. बाबासाहेब आंबेडकर अनुसंधान केंद्र, नागपूर संस्थेच्या श्रेणीवर्धनासाठी संबंधित आर्थिक वर्षांमध्ये अनावर्ती व आवर्ती स्वरुपाच्या खर्चासाठी वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने नोंदविलेल्या निधीच्या मागणीनुसार प्रकल्प किंमतीच्या दायित्व स्वीकृतीच्या प्रमाण (७५ टक्के) एकूण रुपये ८७४.२३ कोटी इतका निधी "अनुसूचित जाती घटक कार्यक्रम"(Scheduled Caste Component Plan) मधून उपलब्ध करून देणे सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास अनिवार्य राहील, याबाबीस मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. सदर प्रकल्पासाठी अनावर्ती व आवर्ती खर्चासाठीचे सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे दायित्व संपुष्टात आल्यावर सदर प्रकल्पासाठी आवश्यक असणारा अनावर्ती व आवर्ती खर्च वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने भागविण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

६. संस्थेच्या श्रेणीवर्धनाची कार्यवाही करताना बांधकाम अंदाजपत्रक, यंत्रसामुग्री, इत्यादी बाबींना प्रचलित कार्यपध्दतीनुसार मान्यता घेण्याची कार्यवाही करण्यास तसेच पदनिर्मितीची कार्यवाही मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील समितीने सत्वर सुरु करावी व वेळेत पदनिर्मिती पूर्ण करावी आणि सदरहू बांधकाम कालबद्ध वेळेत पूर्ण करावे, यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

७. शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व अतिविशेषोपचार रुग्णालये सार्वजनिक खाजगी भागीदारी (पीपीपी) तत्वावर स्थापित करणेबाबत धोरण निश्चिती करण्यास प्रदान करण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरुन, याविषयी निश्चित करण्यात आलेल्या धोरणातील सुयोग्य मॉडेलच्या माध्यमातून सदर प्रकल्प अंशत: / पूर्णत: सार्वजनिक खाजगी भागीदारी (पीपीपी) तत्वावर विकसित करण्याची शक्यता तपासून व त्यानुषंगाने उचित कार्यवाही करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

८. डॉ. बाबासाहेब आंबेडकर रुग्णालय व अनुसंधान केंद्र, नागपूर संस्थेचे श्रेणीवर्धनातंर्गत करण्यात येणारे बांधकाम नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण ( पूर्वीचे नागपूर सुधार प्रन्यास ) मार्फत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, नियोजन व वित्त विभागाने अनुक्रमे त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक युओआर२२७/एसजेएसए, दिनांक २८/१२/२०२०, युओआर ८७/ एसजेएसए, दिनांक १७/०५/२०२१, अनौसं १३१/१४७५, दिनांक ११/०६/२०२१, अनौसं ३८२/२०२१/व्यय-१३, दिनांक २६/०७/२०२१ अन्वये दिलेले अभिप्राय व शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१३१७०००४३०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Babanrao Surwase

Digitally signed by Prakash Babanrao Surwase
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=80b7aac85d2bc48d92746fc668ed758d69aeddf95746d0042863b2a0ce71dc1f, pseudonym=22F9E51BE81F4F3AE79C3DF8E5A0EFCCC3354857, serialNumber=6B133E92365A7935768A9BFA0220E77FC95C2726F4A9EB86D8D0C7E623A2B976, cn=Prakash Babanrao Surwase
Date: 2021.10.13 20:03:45 +05'30'

( प्रकाश सुरवसे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
५) महालेखापाल- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, सामाजिक न्याय विशेष सहाय्य विभाग, मुंबई
१०) सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
११) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१२) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१३) मा.मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व मंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५) मा. राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.

१८) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१९) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
२१) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२२) अधिष्ठाता, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर
२३) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर
२४) जिल्हा शल्य चिकीत्सक, नागपूर
२५) निवड नस्ती (प्रशा-१).

**शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक न्यायाप्र २०१८ / प्र.क्र.१७४ / प्रशासन -१, दिनांक १३.१०.२०२१ चे परिशिष्टः-**

डॉ.बाबासाहेब आंबेडकर रुग्णालय व अनुसंधान केंद्र, नागपूर संस्थेच्या सुधारित श्रेणीवर्धन प्रस्तावात समाविष्ट अंदाजित अनावर्ती व आवर्ती खर्चाचे विरवरणपत्र.

१. बांधकाम व यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीसाठी लागणारा अंदाजित अनावर्ती खर्च

| अ.क्र. | बाब | अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १. | बांधकाम | ८७६,२८,००,२२८ |
| २. | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | ११२,७४,९१,००० |
| | एकूण | ९८९,०२,९१,२२८ |

२. संस्थेच्या श्रेणीवर्धनातंर्गत लागणारा अंदाजित आवर्ती खर्च

आवश्यक पदे व त्यावरील खर्च वेतनाचा खर्च

| अ.क्र. | संवर्ग | एकूण आवश्यक पद संख्या | वेतनाचा खर्च (प्रतिवर्ष) |
|---|---|---|---|
| १. | वर्ग - १ | ६२ | १७४८८९२२४ |
| २. | वर्ग - २ | १०७ | ११९९२८०१२ |
| ३. | वर्ग- ३ (नियमित) | ६३५ | ३६१९१३१८४ |
| ४. | वर्ग-३ (काल्पनिक) | ११ | १३२०००० |
| ५. | वर्ग-४ (कंत्राटी) | २९५ | २८३२०००० |
| ६. | वरिष्ठ निवासी-१ | ७ | ५७०२००४ |
| ७. | वरिष्ठ निवासी- २ | ७ | ५८४३३७६ |
| ८. | वरिष्ठ निवासी-३ | ७ | ५९८४७४८ |
| ९. | कनिष्ठ निवासी-१ | २७ | २०९१४५२४ |
| १०. | कनिष्ठ निवासी-२ | २७ | २१०९६२८८ |
| ११. | कनिष्ठ निवासी-३ | २७ | २१२७८०५२ |
| | एकूण | १२१२ | ७६,७१,८९,४१२ |

३. वेतन व्यतिरिक्त अन्य उद्दीष्टांतर्गत लागणारा पहिल्या तीन वर्षाच्या आवर्ती खर्चाची विगतवारी

| अ.क्र. | खर्चाचा तपशील | प्रथम वर्ष | द्वितीय वर्ष | तृतीय वर्ष |
|---|---|---|---|---|
| १. | मजूरी/ प्रवास | ४१०००० | ४५०००० | ६००००० |
| २. | दूरध्वनी / विज / पाणी | ४५००००० | ४८००००० | ५५००००० |
| ३. | भाडेपट्टी व कर | ४०००० | ६०००० | १००००० |

| अ.क्र. | खर्चाचा तपशील | प्रथम वर्ष | द्वितीय वर्ष | तृतीय वर्ष |
|---|---|---|---|---|
| ४. | संगणक | ३०००० | ३०००० | ४०००० |
| ५. | सामुग्री व पुरवठा | ९०००००० | १०००००००० | ११०००००० |
| ६. | कार्यालयीन खर्च | १३००००० | १७००००० | २०००००० |
| ७. | आहार खर्च | ५००००० | ८००००० | १२००००० |
| ८. | इंधन | ८०००० | ९०००० | १३०००० |
| ९. | लहान बांधकामे | १००००० | १३०००० | १७०००० |
| १०. | इतर | २०००० | ३०००० | ३०००० |
| | एकूण | १,५९,८०,००० | १,८०,९०,००० | २,०७,७०,००० |

४. डॉ.बाबासाहेब आंबेडकर रुग्णालय व अनुसंधान केंद्राच्या श्रेणीवर्धनातंर्गत अनावर्ती व आवर्ती स्वरुपाचा लागणाऱ्या उपरोक्त नमूद खर्चाची पहिल्या तीन वर्षाची विगतवारी

१. अनावर्ती खर्चाची पहिल्या तीन वर्षाची वर्षनिहाय विगतवारी

| अ. क्र. | खर्चाचा तपशील | प्रथम वर्ष | द्वितीय वर्ष | तृतीय वर्ष | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १. | बांधकाम | ३०५,६७,२९,१६० | ३०५,६७,२९,१६० | २६४,९३,४१,९०८ | ८७६,२८,००,२२८ |
| २. | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | ५०,००,००,००० | ५०,००,००,००० | १२,७४,९१,००० | ११२,७४,९१,००० |

२. आवर्ती स्वरुपाच्या खर्चाची पहिल्या तीन वर्षाची वर्षनिहाय विगतवारी

| अ. क्र. | खर्चाचा तपशील | प्रथम वर्ष | द्वितीय वर्ष | तृतीय वर्ष |
|---|---|---|---|---|
| १. | वेतन | २९७०००७३२ | ५२८४२१६४४ | ६५६७३०४२० |
| २. | वर्ग-३ (काल्पनिक पदे) ते ४ बाहयस्त्रोत पदांचा खर्च | ११६४०००० | २१२८८००० | २९६४०००० |
| ३. | विद्यावेतनावरील खर्च | २८६०९२०० | ५७२१८४०० | ८०८१८९९२ |
| ४. | इतर उद्दीष्टांसाठी आवश्यक आवर्ती खर्च | १५९८०००० | १८०९०००० | २०७७०००० |
| | एकूण | ३५,३२,२९,९३२ | ६२,५०,१८,०४४ | ७८,७९,५९,४१२ |

आवर्ती खर्चाच्या संदर्भात, तिसऱ्या वर्षी दर्शविण्यात आलेला आवर्ती खर्च प्रकल्पासाठीचा चौथ्या वर्षापासून प्रतिवर्ष येणारा आवर्ती खर्च असेल.